नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामीण पायाभूत विकास निधी मालिका १९ (RIDF-XIX) अंतर्गत मंजूर २८ ग्रामीण सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पांतर्गत मौजे आष्टी, ता. परतूर, जि. जालना या गावाच्या सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पाला दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र.नाबार्ड-२०१८/प्र.क्र.३१२ /पापु-१६**
७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १० जुलै, २०१८.

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः नाबार्ड-२०१७/प्र.क्र.९६/पापु-१६, दिनांक - ०८/०८/२०१७.**

२) **शासन निर्णय क्रमांकः जस्वका-२/०५१८/प्र.क्र.१०२/पापु-११,दिनांक- १५/०५/२०१८.**

**प्रस्तावना -**

उपरोक्त वाचा १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ०३ अन्वये नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामीण पायाभूत ग्रामीण विकास निधी मालिका १९ (RIDF-XIX) अंतर्गत मौजे आष्टी, ता.परतुर, जि. जालना या गावाचा सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी रू. ४१६.९१ लक्ष एवढ्या प्रकल्प किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि, उपरोक्त वाचा २ येथील शासन निर्णयानुसार आष्टी, ता. परतूर, जि. जालना या सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्पाच्या रू. ४१६.९१ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास जागतिक बँक अर्थ सहाय्यित जलस्वराज्य -२ कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने उपरोक्त वाचा १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ०३ अन्वये नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामीण पायाभूत ग्रामीण विकास निधी मालिका १९ (RIDF-XIX) अंतर्गत मौजे आष्टी, ता.परतुर, जि. जालना या गावाच्या सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी रू. ४१६.९१ लक्ष एवढ्या प्रकल्प किंमतीस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

उपरोक्त वाचा १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ०३ अन्वये नाबार्ड अर्थसहाय्यीत ग्रामीण पायाभूत ग्रामीण विकास निधी मालिका १९ (RIDF-XIX) अंतर्गत मौजे आष्टी,

ता.परतुर, जि. जालना या गावाच्या सांडपाणी व्यवस्थापन प्रकल्प राबविण्यासाठी रू. ४१६.९१ लक्ष एवढ्या प्रकल्प किंमतीस देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१०१५१२५५६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Smita
Sachin
Rane

Digitally signed by Smita Sachin Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, serialNumber=4b9befd340493837db4cffafa6b96eeaf6aa3c12a7a6bf0467b0f517b724e8ee, cn=Smita Sachin Rane
Date: 2018.07.10 16:50:56 +05'30'

**( स्मि.स.राणे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री ( पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री ( पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव.
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव ( पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग ),मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधीकरण, मुंबई.
८. विभागीय आयुक्त,विभाग सर्व
९. महासंचालक माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जालना.
११.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई.
१३.प्रबंधक, नाबार्ड, पुणे.
१४.उपायुक्त (विकास),विभाग सर्व.
१५.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता/पंचायत),जिल्हा परिषद, जालना.
१६.नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१७.वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.
१८.कार्या. पापु-११, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवडनस्ती,कार्या.पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.